**दिनांक २६ जानेवारी, २०२० रोजी ध्वजारोहन कार्यक्रमापुर्वी भारताच्या संविधानामधील उद्देशिका / Preamble याचे सामुहिक वाचन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण २०२०/प्र.क्र.२५/आस्था-५**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई ४०० ००१.
तारीख: २२ जानेवारी, २०२०

**शासन परिपत्रक :-**

भारताची राज्यघटना दिनांक २६ नोव्हेंबर ,१९४९ रोजी स्वीकारण्यात आली. या निमित्ताने प्रत्येक वर्षी २६ नोव्हेंबर हा दिवस संविधान दिन म्हणून साजरा केला जातो . संविधान दिनांक २६ जानेवारी,१९५० पासून अंमलात आले असून भारतीय संविधानाची पुरेशी माहिती नागरिकांना असणे आवश्यक आहे . भारतीय राज्य घटनेतील मुलतत्त्वांची व्याप्ती व सर्व समावेशकता सर्व नागरिकांना समजावी आणि त्याचबरोबर घटनेतील न्याय, स्वातंत्र्य, समानता व बंधुता ही मुलतत्वे समाज मनावर कोरली जावीत यासाठी संविधानाचा परिपूर्ण परिचय नागरिकांना होणे आवश्यक आहे . भारतीय संविधानातील मुलतत्त्वे, संवैधानिक हक्क आणि कर्तव्ये स्वतंत्र भारताच्या नागरिकांना संस्कारित करणारी असून नागरिकांच्या मनात याची रुजवणूक झाल्यास जबाबदार, सुजाण व सुसंस्कृत नागरिक घडविण्यास मदत होईल.

२. त्यामूळे दिनांक २६ जानेवारी, २०२० पासून दरवर्षी होणाऱ्या ध्वजारोहन कार्यक्रमापुर्वी भारताच्या संविधानामधील उद्देशिका (सरनामा) / Preamble याचे सामुहिक वाचन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२०१३११०८७४२० असा आहे . हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

PANDIT KAHANDERAO JADHAV

Digitally signed by PANDIT KAHANDERAO JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f5c40942371a6969108d4d7e802129ea5f7a19f482726930e17fe1f06ad5cc76, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PANDIT KAHANDERAO JADHAV
Date: 2020.01.22 15:14:17 +05'30'

**( पं. खं. जाधव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, सर्व विभाग,
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद,
३. गट विकास अधिकारी, सर्व पंचायत समिती.

गट विकास अधिकारी, सर्व पंचायत समिती यांना सुचित येते की, सदर बाब सर्व ग्राम पंचायतींच्या निदर्शनास आणण्यात यावी.